सन २०२४-२०२५ करिता राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणांतर्गत लेखाशीर्ष २०७००८८२, १०-कंत्राटी सेवा व २८- व्यावसायीक सेवा या अंतर्गत पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं-१२२५/प्र.क्र.१८/१३-स**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:-२९ मार्च, २०२५.

**वाचा :-** १.राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे, क्रमांक:- जा.क्र. रासनिप्रा / निवडणूक/ लेखा/ कक्ष-१५/ पुरवणी मागणी /फेब्रु.२५/५५२/ २०२५, दिनांक ३० जानेवारी, २०२५ रोजीचे पत्र.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थस -२०२४/ प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १७ मार्च,२०२५.

३. सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: पुरक -१९२५/ प्र.क्र.१३/२०२५/१७स, दिनांक १७ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे वाचा क्र.१ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने कंत्राटी सेवा या बाबीसाठी बाह्यस्त्रोताव्दारे कंत्राटी लिपिक-टंकलेखक तसेच, सेवानिवृत्त कंत्राटी अधिकारी व कर्मचारी यांचे परिश्रमिक व व्यावसायीक सेवा या बाबीसाठी वकील फीची रक्कम अदा करण्यासाठी अर्थसंकल्पीय अधिवेशन मार्च, २०२५ च्या पुरवणी मागणीद्वारे १०-कंत्राटी सेवा या बाबीसाठी रुपये ३१,०९,०००/- व २८-व्यावसायीक सेवा या बाबीसाठी रुपये १,७५,०००/- असे एकूण रुपये ३२,८४,०००/- (अक्षरी रुपये बत्तीस लाख चौऱ्याऐंशी हजार फक्त) इतक्या रकमेचा पुरक मागणीचा प्रस्ताव विधानमंडळास सादर करण्यात आला होता. त्याअनुषंगाने पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेला निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयासाठी मार्च, २०२५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात मागणी क्र.व्ही-२, २०७०- इतर प्रशासनिक सेवा (००) (८००)- इतर खर्च (००)(००)(०१), राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, (२०७० ०८८२) १०-कंत्राटी सेवा याकरिता रूपये ३१,०९,०००/- व २८-व्यावसायीक सेवा याकरिता रुपये १,७५,०००/-असे एकूण रुपये ३२,८४,०००/-इतक्या निधीची पुरवणी मागणी मंजूर करण्यात आली आहे.

**२.** उपरोक्त मंजूर पुरवणी मागणीचा तपशील विचारात घेता बाब १०-कंत्राटी सेवा याकरिता रुपये ३१,०९,०००/- व बाब २८-व्यावसायीक सेवा याकरिता रुपये १,७५,०००/- असे पुरवणी मागणीद्वारे मंजूर एकूण रुपये ३२,८४,०००/- (अक्षरी रुपये बत्तीस लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरणास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**३.** या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला एकूण रुपये ३२,८४,०००/- (अक्षरी रुपये बत्तीस लक्ष चौऱ्याऐंशी हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यासाठी सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन)

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी (V0004) म्हणून व सह सहकारी निवडणुक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. निवडणूक प्राधिकरणांतर्गत कंत्राटी सेवा व व्यावसायीक सेवा या बाबींकरीता वितरीत करण्यात येणारी रक्कम निवडणूक प्राधिकरण, २०७० ०८८२ अंतर्गत बाब १०- कंत्राटी सेवा व बाब २८- व्यावसायीक सेवा या लेखाशिर्षाखाली खर्ची पडेल.

**४.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीत संदर्भ क्रमांक २५७/२०२५/व्यय-२, दिनांक २४.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२९१९२९५४९३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2025.03.29 19:31:13 +05'30'

**( संतोष पाटील )**
**अपर निबंधक तथा सह सचिव**
**महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. आयुक्त, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१, मुंबई.
५. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई/ पुणे.
६. अवर सचिव (१७स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. उप सचिव, व्यय-२ / अर्थ-१३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

प्रत :-

१. मा.प्रधान सचिव (सहकार व पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
२. निवडनस्ती १३-स.